**नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात अधिसुचित विशिष्ट नागरी सेवा व सुविधा पुरविण्यासाठी निधी उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(४५)/का-१४११,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दि.१४ मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३३/का-१४११, दि.२८ मार्च, २०२२,
२) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.२९ मार्च, २०२२.
३) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.७ जुलै, २०२२,
४) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३.

**प्रस्तावना :-**

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करण्यासाठी "महानगरपालिका क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे" व "नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे या योजनांना वाचा येथील अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून त्याअंतर्गत करावयाच्या कामांसाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. (२.४), ३, ४ व ७ येथील तरतुदींमध्ये वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली होती. तथापि, वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये करण्यात आलेल्या सुधारणा रद्द करुन वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील तरतूदी वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयान्वये पुनःस्थापित करण्यात आल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या यादीतील विकास कामांना शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करणे (नगरपालिका/नगरपंचायत/नगरपरिषद)" या योजनेअंतर्गत शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार जुन्नर नगरपंचायत अंतर्गत सोबत दिलेल्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या रू.१५.०० कोटी एवढ्या किंमतीच्या कामांची थेट शासन स्तरावरून निवड करण्यात आली आहे. सदर कामांसाठी कार्यान्वयीन यंत्रणा सार्वजनिक बांधकाम विभाग (उत्तर) ही राहील.

२. शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार उपरोक्त कामांना संबंधित कार्यान्वयीन यंत्रणा यांनी तांत्रिक मान्यता व जिल्हाधिकारी, पुणे यांनी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची कार्यवाही करावी. प्रशासकीय मान्यता परिशिष्टातील रकमेच्या मर्यादेत असल्याची दक्षता जिल्हाधिकारी, पुणे यांनी घ्यावी.

३. शासन निर्णय नियोजन विभाग क. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार सोबतच्या परिशिष्टातील कामांसाठी प्राप्त होणारे अनुदान वितरीत करण्याकरिता जिल्हाधिकारी, पुणे यांच्या नावे स्वतंत्र बँक खाते उघडण्यात यावे. बँक खात्याचा तपशील

(IFSC कोड व खाते क्रमांक) नियोजन विभाग सादर करावा. त्यानंतर सदर निधी उक्त बँक खात्यामध्ये सोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येईल.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या कामांसाठी जिल्हाधिकारी, पुणे / कार्यान्वयीन यंत्रणा सार्वजनिक बांधकाम विभाग (उत्तर) यांनी संदर्भ क्र. (१) व (४) येथील शासन निर्णयामधील अन्य सर्व अटी व शर्तीचे पालन करावे.

५. सदर कामांवर होणारा खर्च मागणी क्र.ओ-९, मुख्य लेखाशीर्ष-३६०४ स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकीत रकमा देणे, (०१)(०२) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना (नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत) सहायक अनुदान (३६०४ १०१८) (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदान याखाली सन २०२३-२४ करिता उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४२०२६३७५६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI

Digitally signed by CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A75E4CF904B78F2AE051843EA1BA6106A393C2B0CF60FE03C945913B2BAE935F, cn=CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
Date: 2024.03.14 20:35:43 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

१. विभागीय आयुक्त, पुणे विभाग,
२. जिल्हाधिकारी, पुणे,
३. मुख्याधिकारी, जुन्नर नगरपंचायत,
४. जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे,
५. मा. उप मुख्यमंत्री(वित्त व नियोजन) महोदयांचे उप सचिव,
६. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल(लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
११. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग(उत्तर), पुणे,
१२. वित्त विभाग, व्यय-८/कोषा प्रशासन-५/अर्थसंकल्प-१६, मंत्रालय, मुंबई,
१३. निवड नस्ती (का-१४११), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

| **शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(४५)/का-१४११, दि.१४/०३/२०२४ सोबतचे परिशिष्ट, जुन्नर नगरपंचायत, जि.अहमदनगर रु.१५.०० कोटी** | | |
|---|---|---|
| **अ क्र** | **कामाचे नाव** | **रक्कम (रु.लक्ष)** |
| १ | जुन्नर शहर येथील वरचा माळीवाडा मारुती मंदिरा समोरील जागेत पार्किंग, शौचालय व पहिल्या मजल्यावर सभागृह बांधणे | ४०.०० |
| २ | जुन्नर शहर येथील रविवार पेठ येथील सुवर्णकार नारहरि येथे बहुउद्देशिय इमारत बांधणे. | ६०.०० |
| ३ | जुन्नर शहर येथील कालिका माता मंदिर शुक्रवार पेठ येथे सभा मंडप बांधणे. | ३०.०० |
| ४ | जुन्नर शहर येथील लक्ष्मीमता मंदिर शुक्रवार पेठ येथे सभा मंडप बांधणे. | १५.०० |
| ५ | जुन्नर शहर येथील शुक्रवार पेठ शनी मंदिरा समोरील जागेत सभा मंडप बांधणे | ३०.०० |
| ६ | जुन्नर शहर येथील दबडे वस्ती येथील जी प्लॉट मध्ये सभा मंडप बांधणे. | २०.०० |
| ७ | जुन्नर शहर येथील श्री स्वामी समर्थ मंदिर कुंभार आळी येथे सभा मंडप बांधणे. | २०.०० |
| ८ | जुन्नर शहर येथील खालचा माळीवाडा कालिका माता मंदिर येथे सभा मंडप बांधणे. | १०.०० |
| ९ | जुन्नर शहर येथील कल्याण पेठ गणपती मंडळ येथे पाहल्या मजल्यावर सभागृह बांधणे. | १५.०० |
| १० | जुन्नर शहर येथील रविवार पेठ जेष्ठ नागरिक विरुंगुळा केंद्र येथे सभागृह व इतर सुविधा उपलब्ध करणे. | ५०.०० |
| ११ | जुन्नर शहर येथील बेळे आळी येथे मारुती मंदिराच्या जागेत संरक्षण भिंत बांधणे. | ५०.०० |
| १२ | जुन्नर शहर येथील इमामवाडा सय्यद वाडा येथे सभा मंडप बांधणे. | ३०.०० |
| १३ | जुन्नर शहर येथील परीट समाज जी प्लॉट मध्ये सभा मंडप बांधणे. | ३०.०० |
| १४ | जुन्नर शहर येथील सूर्यकुंड मंदिरासमोरील जागेत सभा मंडप बांधणे. | २०.०० |
| १५ | जुन्नर शहर येथील देवांग समाज भोई आळी विठ्ठल मंदिरा समोरील जागेत सभा मंडप बांधणे. | ३०.०० |
| १६ | जुन्नर शहर येथीलभोई आळी येथील जगदंबा माता मंदिर येथे रंगकाम टाईल्स फ्लोरिंग प्लास्टर करणे. | ३०.०० |
| १७ | जुन्नर शहर येथील अमोल गायकवाड यांच्या घरा मागील नगरपालिका जागेत व्यायाम शाळा बांधणे. | २५.०० |
| १८ | जुन्नर शहर येथील तेली बुधवार पेठ मारुती मंदिरा समोरील जागेत सभा मंडप बांधणे. | १५.०० |
| १९ | जुन्नर शहर येथील तेली बुधवार पेठ येथील रस्त्याच्या साईड पट्टी कॉक्रिट करणे. | २०.०० |
| २० | जुन्नर शहर येथील श्री श्वेतांबर मूर्तिपूजक जैन मंदिर येथे सभामंडप बांधणे व सुशोभिकरण करणे. | १००.०० |
| २१ | जुन्नर शहर येथील गणेश पेठ मारुती मंदिर समोरील जागेत सभा मंडप बांधणे. | १०.०० |
| २२ | जुन्नर शहर येथील सय्यदवाडा येथे मदरसा बांधणे. | २०.०० |
| २३ | जुन्नर शहर येथील बोडकेनगर आकाश फिश शेजारील रस्ता कॉंक्रीट करणे. | ३०.०० |
| २४ | जुन्नर शहर येथील नंदन वन सोसायटीत रस्ता कॉंक्रीट करणे. | २०.०० |
| २५ | जुन्नर शहर येथील शिपाई मोहल्ला दिवाने अहेमद ट्रस्ट सभागृह बांधणे | ५०.०० |
| २६ | जुन्नर शहर येथील शिपाई मोहल्ला येथे मदरसा माजोदिया मजीद ट्रस्ट स्वच्छता गृह बांधणे व सुशोभीकरण करणे | ४०.०० |

| **शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(४५)/का-१४११, दि.१४/०३/२०२४ सोबतचे परिशिष्ट, जुन्नर नगरपंचायत, जि.अहमदनगर रु.१५.०० कोटी** | | |
|---|---|---|
| **अ क्र** | **कामाचे नाव** | **रक्कम (रु.लक्ष)** |
| २७ | जुन्नर शहर येथील पिरजादे वाडा इनामदार कब्रस्थान सुशोभिकरण करणे | ४०.०० |
| २८ | जुन्नर शहर येथील माई मोहल्ला सुलेमान शेठ घरापासून ते मदरसे मोमादिया चौक रस्ता करणे | ३०.०० |
| २९ | जुन्नर शहर येथील कागदी वाडा येथे मदरसाचे उर्वरित काम करणे | ५०.०० |
| ३० | जुन्नर शहर येथील पनसुबा पेठ सौदागर मस्जीद व मदरसा कादारीया नवीन इमारत बांधणे | ५०.०० |
| ३१ | जुन्नर शहर येथील शिपाई मोहल्ला येथे अंजुमन इत्तेहाद ट्रस्ट प्रायमरी शाळे शेजारील मोकळ्या जागेत स्वच्छता गृह व पेविंग ब्लॉक बसविणे | २०.०० |
| ३२ | जुन्नर शहर येथील खलीलपुरा सलोनी मस्जीद येथील संरक्षण भिंत व अंतर्गत सुशोभीकरण करणे | २५.०० |
| ३३ | जुन्नर शहर येथील पनसुंबा पेठ कय्युम खुरेशी यांचे घरासमोरील दर्ग्यापासून ते अजीज इनामदार यांचे घरापर्यंत पाईप गटर व कॉंक्रिटीकरण करणे | २०.०० |
| ३४ | जुन्नर शहर येथील सय्यदवाडा जाकीर हुसेन कारखाना समोर  गार्डन व अंतर्गत सुशोभिकरण करणे | २०.०० |
| ३५ | जुन्नर शहरातील खलील पुरा येथील मशिदी पाठीमागचा कुरेशी समाजाचा सभा मंडप दुसऱ्या टप्प्याचे बांधकाम करणे | २०.०० |
| ३६ | जुन्नर येथील खलीलपुरा जुना कागद कारखाना येथील पटेल कब्रस्थान (कालावावर) कबरस्थानचे संरक्षण भिंत व ड्रेनेज व अंतर्गत सुशोभीकरण करणे | २०.०० |
| ३७ | जुन्नर शहर येथील शिपाई मोहल्ला दारुलुम गौसे आजम येथे पत्रा शेड व आरसीसी घुमट मिनार वेस व स्वच्छतागृह व अंतर्गत सुशोभीकरण करणे | २०.०० |
| ३८ | जुन्नर शहर येथील अल्ली खाना मुस्लिम बँक समोर आली खाना बोळ जुनी मुलींची शाळा पर्यंत कॉंक्रिटीकरण करणे | २०.०० |
| ३९ | जुन्नर शहर येथील शिपाई मोहल्ला स्टार किचन सेंटर बैजुभाई पासून ते सुलेमान शेठ घरापर्यंत रस्ता कॉंक्रिटीकरण करणे | ३०.०० |
| ४० | जुन्नर शहर येथील पणसुंबा पेठ  दारुलअलुम रहमते अलम कामाचा दुसरा टप्पा पूर्ण करणे | २०.०० |
| ४१ | जुन्नर शहर येथील शिपाई मोहला येथे रोशन मजीत समोरील इनामदार कब्रस्तान  चारही बाजूने आरसीसी वॉल कंपाऊंड करणे व अंतर्गत सुशोभीकरण करणे | २०.०० |
| ४२ | जुन्नर शहर येथील ढोर आळी हलवाई गल्ली (मंगळवार पेठ)  येथील चार शीट शौचालय बांधकाम करणे | २०.०० |
| ४३ | जुन्नर शहर येथील हलवाई गल्ली मंगळवार पेठ ढोहर हलवाई गल्ली येथील चार्जशीट शौचालय बांधकाम करणे | २५.०० |
| ४४ | जुन्नर शहर येथील माहीमोहल्ला मनियार मस्जीद बांधकाम करिता व उर्वरित सुशोभीकरण व वेस बांधण्यासाठी व अपूर्ण काम पूर्ण करण्यासाठी | २५.०० |
| ४५ | जुन्नर शहर येथील  उत्तरेश्वर रस्ता शेजारील काजी तिरंगा शेख कब्रस्तान ऑल कंपाऊंड करणे व आरसीसी पाण्याची टाकी करणे व अंतर्गत सुशोभीकरण करणे | ३०.०० |

| शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(४५)/का-१४११, दि.१४/०३/२०२४ सोबतचे परिशिष्ट, जुन्नर नगरपंचायत, जि.अहमदनगर रु.१५.०० कोटी | | |
|---|---|---|
| **अ क्र** | **कामाचे नाव** | **रक्कम (रु.लक्ष)** |
| ४६ | जुन्नर शहर येथील पाडळी येथे काली मस्जीद ट्रस्ट पाडळी येथील सेवा मंडप व कॉंक्रिटीकरण करणे व अंतर्गत सुशोभिकरण करणे | २५.०० |
| ४७ | जुन्नर शहर येथील पाडळी येथे आले हे कुरेशी कब्रस्तान सभा मंडप करणे | १०.०० |
| ४८ | जुन्नर शहर येथील चांदीपुरा पेठ येथे पीर चमन मस्जीद ट्रस्ट येथील अंतर्गत दुरुस्ती करणे | १०.०० |
| ४९ | जुन्नर शहर येथील मंगळवार पेठ अमानतकी ते स्वामी समर्थ मंदिर पर्यंत बंदिस्त पाईप गटार करणे | १०.०० |
| ५० | जुन्नर शहर येथील बारव येथे मुस्लिम समाज शादी खाना इलेक्ट्रिक काम करणे | १०.०० |
| ५१ | जुन्नर शहर येथील नेहरू बाजारपेठ येथील अशुरखाना ट्रस्ट सभामंडप बांधणे व अंतर्गत सुशोभीकरण करणे | १५.०० |
| ५२ | जुन्नर शहर येथील शिपाई मोहल्ला येथे सुभेदार फॅमिली कब्रस्तान ट्रस्ट शिपाई मोहल्ला येथील संरक्षण भिंत करणे व अंतर्गत सुशोभीकरण करणे | १०.०० |
| ५३ | जुन्नर शहर येथील शिपाई मोहला येथे नदीम बेग घरापासून ते नईम बेग घरापर्यंत कॉंक्रिटीकरण करणे | १०.०० |
| ५४ | जुन्नर शहर येथील पाडळी येथे इनामदार कब्रस्तान येथील कब्रस्तान मध्ये पाण्याचे आरसीसी टाकी बांधणे व कब्रस्तान आतील अंतर्गत सुशोभीकरण करणे | १०.०० |
| ५५ | जुन्नर शहर येथील माई मोहल्ला येथील मदरसा मोहम्मदीया लगतच्या जागेत वजूखाना व स्वच्छतागृह बांधणे | १०.०० |
| ५६ | जुन्नर शहर येथील माईमोहल्ला मिस्किन शहा बाबा व मदरसा मोहनदिया आतून व बाहेरून कलर काम व अंतर्गत सुशोभीकरण करणे | ५.०० |
| ५७ | जुन्नर शहर येथील इस्लामपूर खडक येथील इनामदार व फकीर ( मुनवर फकीर घराशेजारील ) कब्रस्तान संरक्षण भिंत व अंतर्गत सुशोभीकरण करणे | १०.०० |
| ५८ | जुन्नर शहर येथील ब्राह्मण बुधवार पेठ येथे गवंडी मज्जित पत्रा शेड अंतर्गत दुरुस्ती करणे | ५.०० |
| ५९ | जुन्नर शहर येथील सय्यद वाडा येथे दरबारासमोर पत्रा शेड करणे | ५.०० |
| ६० | जुन्नर शहर येथील हलवाई गल्ली बक्कर कसाब मस्जीद अंतर्गत सुशोभीकरण व वॉल कंपाऊंड करणे | १०.०० |
| ६१ | जुन्नर शहर येथील मंगळवार पेठ येथे मोमीन मस्जीद अंतर्गत दुरुस्ती करणे व नवीन वजूखाना करणे व अंतर्गत सुशोभीकरण करणे | १०.०० |
| ६२ | जुन्नर शहर माई मोहल्ला येथे रहमत नगर येथील हजरत शमशुद्दीन बाबा दरगाह मध्ये टाइल्स लावणे कलर काम करणे व अंतर्गत सुशोभीकरण करणे | १०.०० |
| ६३ | जुन्नर शहर येथील शिपाई मोहल्ला येथे लंबू बाबाची दरगाहाचे अंतर्गत सुशोभीकरण करणे | ५.०० |
| ६४ | जुन्नर शहर येथील पंचुंबापेठ हासनजी बाबा दर्गाह अंतर्गत सुशोभीकरण व टाइल्स बसवणे व कलर काम करणे | ५.०० |
| | **एकूण** | **१५००.००** |